# सीजर चावेझ

लेखकः एरिक ब्राऊन

चित्रेः हॅरी रोलँड, स्टीव्ह अर्विन, बार्नेट 3

मराठी अनुवादः सुशील मेन्सन



प्रकरण 1

# कठोर परिश्रम

1933 साली, चावेझ कुटुंब कठीण परिस्थितीतून जात होते. *लिब्राडो चावेझ* ॲरिझोनातील आपल्या छोट्याशा शेतीचा कर भरू शकले नव्हते.

तू कर भरलेला नाहीस. त्यामुळे ते शेत आता तुझं राहिलं नाही.

त्याकाळी, अमेरिकेत आर्थिक मंदी आली होती. अमेरिकी जनता बेकारी आणि गरीबीत जगत होती.

चावेझ कुटुंबाने गरजेपुरते सामान गाडीत भरले आणि बाकी मालमत्ता सोडून तिथून निघून गेले.

माझी मनीमाऊ?

गाडीत जागा नाही, सीजर.

चावेझ कुटुंब कॅलिफोर्नियाला गेले. तिथे ते इतर लोकांच्या शेतावर मजूर म्हणून राबू लागले.

कॅलिफोर्नियात कामाच्या शोधात अशी हजारो कुटुंबे आली होती. त्यांचे काम कष्टाचे होते, पण त्यांना वेतन अपुरे मिळत असे.

लवकर जेवून घ्या, पोरांनो. म्हणजे, लवकर झोपता येईल. पहाटेलाच उठायचंय आपण.

का?

त्यामुळे आपल्याला दिवसभर काम मिळेल.

पण मला भूक आहे अजून.

कित्येक वर्षे चावेझ कुटुंबाने कॅलिफोर्नियात पीककापणीचे काम केले. त्यांनी गाजर, कापूस, द्राक्षे आणि लेट्यूस ही पीके घेतली. एका जागी काम संपले की ते दुसऱ्या शेतावर जाऊन काम करत.

या हिरव्या पाल्याला हिरवं सोनं म्हणतात, शेतकरी.

त्यांच्यासाठी असेल हे सोनं! आपण मान मोडून काम करायचं आणि त्यांनी हे सोनं विकून श्रीमंत व्हायचं!

मजुरांच्या कामावर देखरेख करण्यासाठी शेतकऱ्यांनी ठेकेदार ठेवले होते. त्यांतील बरेचसे लोभी होते. ते मजुरांना कमी वेतन देऊन त्यांची फसवणूक करत.

तुम्ही दिवसाला 4 डॉलर म्हणाला होतात.

माझं मन बदललंय. आता 2 डॉलर मिळतील. घ्यायचंय तर घे नाहीतर जा.

सीज़र, रीटा, चला निघू. हे बरोबर नाही. आपण इथे काम करायचं नाही.

मजुरांना फसवत असतील तिथे काम नाही करायचं. मग भूके राहिलो तरी चालेल.

संप

Huelga!

स्पॅनिश शब्द "ह्यूलेगा“ चा अर्थ संप. जोपर्यंत मालक मजुरांना नोकरीच्या अटी ठरवण्यात सहभागी करत नाहीत तोपर्यंत मजुरांनी काम करण्यास नकार दिला, मजुरांनी जास्त वेतन आणि सोयीसुविधांचीही मागणी केली.

सीजरचे कुटुंब सतत भटकंती करत. या काळात, सीजर 30 पेक्षा जास्त शाळांमध्ये शिकला..

आम्ही गेल्याच आठवड्यात तो धडा पूर्ण केला, सीजर.

आठवीनंतर, सीजरने शाळा सोडली आणि तो पूर्णवेळ शेतावर काम करू लागला.

वयाच्या 17 व्या वर्षी सीजर अमेरिकी नौदलात नोकरी करू लागला. दोन वर्षांनी परतल्यावर, मजुरांची स्थिती बदलली नसल्याचे त्याला दिसले.

मी युद्धात देशाची एवढी सेवा केली, पण माझ्या लोकांचं आयुष्य बदललं नाही. शेतमालकांनी आपलं वेतन वाढवलं नाही.

आपल्याला डॉक्टर आणि औषधंसुद्धा परवडत नाहीत.

सीजरने मजुरांची वस्ती सोडली. पण त्याचे नवे घर काही फार चांगले नव्हते. 1952 साली, सीजर आणि त्याची पत्नी, *हेलन*, कॅलिफोर्नियातील सॅन होसे शहरात स्थायिक झाले. या गरीब, दाटीवाटीच्या वस्तीचे स्पॅनिश नाव होते *साल सी प्युडेस*. त्याचा अर्थ होता, “निघा इथून, तुमच्यात हिंमत असेल तर.”

तिथे सीजरची मैत्री पाद्री *डोनाल्ड मॅकडोनेल* याच्याशी झाली.

पाच वर्षांची मुलंसुद्धा शेतात तासनतास काम करतात!

त्यांनी शाळेत गेलं पाहिजे. त्यांनी कष्टाची कामं करणं बरोबर नाही..

अन्याय आहे हा!

बदल व्हायला हवा. लोकांना रोजगार आणि सुरक्षित वातावरण पाहिजे. आजारपणात त्यांना कामावरून काढून टाकणं योग्य नाही.

हे पुस्तक वाचा, *गांधी जीवन*. गांधींनी हिंसा न करता भारतात सामाजिक बदल घडवून आणले.

प्रकरण 2

# संघटन

जून 1952 मध्ये *फ्रेड रॉस* नावाचा एक इंग्रज सीजरच्या घरी आला. रॉस *सामुदायिक सेवा संस्था CSO* तर्फे लॅटिनो नागरी हक्क गटासाठी काम करत असे. सुरुवातीला, सीजर आणि त्याच्या मित्रांनी त्याच्यावर विश्वास ठेवला नाही.

मुलं घाणेरड्या नाल्यात खेळतात. पोलीस तुम्हाला मारतात. तुम्हाला पैसे कमी मिळतात.

त्याला आमचे प्रश्न ठाऊक आहेत.

तुम्ही कसे सोडवणार हे प्रश्न?

रॉसच्या शब्दांनी सीजरचे लक्ष वेधून घेतले.

आमच्या CSO संस्थेने कॅलिफोर्नियातील भेदभाव करणाऱ्या शाळा, थिएटर बंद केले. मेक्सिकन मजुरांना तुरुंगात मारणाऱ्या पोलिसांना शिक्षा दिली.

हो. ऐकलंय त्याबद्दल मी.

एकटा मजूर दुबळा असतो. पण CSO लोकांचं संघटन असल्यामुळे प्रभावी ठरते.

सीजरने CSO सोबत काम करण्यास तयारी दाखवली. पुढल्या दिवशी, सीजरने शेजाऱ्यांचे दार ठोठावले.

लॅटिनोंसाठी आपण मत द्यायला हवं. तेव्हाच आपली परिस्थिती बदलेल. ही CSO च्या उमेदवारांची यादी.

मी कधी मतदान केलं नाही.

सीजर लोकांचे संघटन करण्यात कुशल होता. त्याने साल सी प्युडेस आणि जवळच्या शहरांत CSO च्या शाखा सुरू केल्या. 1959 साली, सीजर संस्थेचा कार्यकारी संचालक बनला.

सीजरच्या नेतृत्वाखाली CSO देशातील सर्वात प्रभावशाली मेक्सिकन-अमेरिकी संघटना बनली. मग सीजर शेतमजुरांची संघटना बांधू लागला.

संघटनेत मजूर मालकांकडे चांगल्या सुविधा देण्याची मागणी करू शकतात.

पण CSO ने शहरातील मेक्सिकन मजुरांसाठीच आपलं मत दिलंय.

सीजर CSO मार्फत संघटना बांधू शकला नाही. त्याने राजीनामा देऊन स्वत:च संघटना बांधण्याचा निर्णय घेतला.

एप्रिल 1962 मध्ये, सीजर आणि हेलन आपल्या आठ मुलांसह डेलेनो शहरात गेले. तिथे तो स्थानिक शेतमजुरांशी बोलला.

आमची संघटना होती पूर्वी.

आमचा नेता निघून गेला आणि संघटना मोडली. मग आम्हाला कुठे काम मिळालं नाही.

मी तुम्हाला सोडणार नाही. ही संघटना माझं स्वप्न आहे.



ठेकेदार प्यायच्या पाण्याचेसुद्धा पैसे घेतो.

आम्हाला चांगले वेतन पाहिजे. घरी साधं पाणीसुद्धा नाही.

उन्हाळ्याच्या अखेरीस, *नॅशनल फार्म वर्कर्स युनियन* NFWA ही संघटना बांधायला पुरेसे सदस्य जमले.

NFWA ने सप्टेंबरमध्ये पहिली सभा घेतली. *डोलोरेस ह्यूएर्टा* आणि सीजरचा भाऊ *रिचर्ड* नव्या संघटनेत महत्त्वाचे पदाधिकारी होते.

आपल्या मागण्यांसाठी लढू. सगळ्या मजुरांना आपल्या मागण्या मांडण्याची संधी मिळेल.

आमच्या मागण्या!

लवकरच, सीजर चावेझ, NWFA आणि आपल्या मागण्या यांची ख्याती सर्वत्र पसरली.

आपण त्यांच्यासाठी गुलाबांच्या काट्यांवरून चालतो, जलद काम करतो. मालकांनी हजार रोपट्यांचे 9 डॉलर द्यायचं कबूल केलं पण ते देतात 6.5 डॉलर.

*मॅकफरलँड* शहरातील गुलाबांची कापणी करणाऱ्या मजुरांनी NFWA कडे मदत मागितली. सीजरने *माऊंट आर्बर* कंपनीविरोधात त्यांचा संप घडवून आणला.

हे गुलाब जहाजाने लवकर पाठवले नाहीत तर मोठे नुकसान होईल.

दुसरा काही पर्याय नाही.

चारच दिवसात मालकांनी वेतन वाढवले. संप समाप्त झाला.

या यशानंतर NFWA चे सदस्य वाढले. मग सप्टेंबर 8, 1962 रोजी सीजरला एक बातमी मिळाली. त्यामुळे NFWA जास्त प्रकाशात आली.

सीजर, फिलिपिनो मजूर डेलेनोच्या द्राक्ष मळ्यात संप करतायत.

मग मालक नक्कीच मेक्सिकोच्या मजुरांकडून काम करून घेतील..

मजूर चांगल्या वेतनासाठी लढतायत. त्यांची नोकरी जायला नको. आपणसुद्धा संपावर जाऊ.



काही दिवसांनी, NFWA ने फिलिपिनो द्राक्ष कापणी करणाऱ्या मजुरांची सभा घेतली.

ते 40 टक्के वाढ म्हणजे तासाला 1.40 डॉलर मजुरी मागतायत. ते खूप गरीब आहेत.

आपण या मजुरबांधवांना मदत करूया. आपणही संपावर जाऊ.

संप!

संप!

NFWA ने आपल्या संपात फिलिपिनोला सहभागी करण्यासाठी मतदान केले. सॅन जोआकीन दरीतील, 48 शेतांवरील 5,000 लोकांनी शेतात काम करणे बंद केले. मालकांनी संप तोडण्यासाठी इतर ठिकाणचे मजूर बोलावून घेतले.

संप!

काम बंद करा!

मजूर बांधवांचा विश्वासघात करू नका.

प्रकरण 3

# डेलानोतील द्राक्ष मजुरांचा संप

संप वाढत गेला तसे त्यात अधिकाधिक मजूर सामील होत गेले. क्रोधित शेतमालकांनी मजुरांना धमकावून त्यांना मारहाणही केली.

कुणीतरी जखमी होणार.

सांभाळा!

पर्वा नाही. मी चिरडून टाकेन सर्वांना!

चालते व्हा इथून!

आईगं!

हे किटकनाशक आहे!



संपकरी रागाने बेभान झाले. पण सीजरने शांतता राखण्यास सांगितले.

चालते व्हा इथनं, किड्यांनो.

ते मारहाण करतायत. कसं गप्प बसायचं?

आम्हाला लढावंच लागेल!

बंधुंनो, हिंसा करून कांही गौरव होणार नाही आपला.

क्या!

सीझरचा अहिंसेचा प्रयोग सर्वदूर पसरला. वृत्तपत्र आणि टिव्ही यांनी हा संप जगासमोर आणला. शांततेने आंदोलन करणाऱ्या मजुरांना मारहाण होत आहे, हे देशभरातील लोकांनी पाहिले. यामुळे शेतमालक अडचणीत येतील, हे सीजरला ठाऊक होते.

आमच्यात घृणा भरलेली असेल तर आम्ही मनापासून काम करू शकणार नाही. घृणेमुळे आमची उर्जा आणि शक्ती वाया जाईल.

NFWA ने फिलिपिनो संघटना आणि शेतमजूर आयोजक समिती (AWOC) सोबत संपकऱ्यांना अन्न दिले, त्यांच्या मुलांची देखभाल केली आणि त्यांना झोपायला जागा दिली.

शेतमालक फिलिपिनो आणि मेक्सिकन मजुरांना शेतात अलग ठेवतात.

ते आपल्यामध्ये नोकरीसाठी स्पर्धा लावतायत.

आता आपण एकत्र काम करायचं.

सीजर संपाला पाठिंबा मिळवण्यासाठी इतर मजूर संघटना, चर्च आणि विद्यापीठांमध्ये गेला.

आम्हाला पैसे आणि अन्न हवंय, तुमची मदत हवीय. तुम्हीसुद्धा संपात सहभागी व्हा.

देणग्यांची बरसात झाली आणि शेकडो स्वयंसेवक संपात सहभागी झाले.

हरताळ!

STRIKE

STRIKE

या शहरी संपकऱ्यांना काय माहीत? त्यांनी आयुष्यात कधी मातीला शिवलंसुद्धा नसेल.

डिसेंबरमध्ये NFWA ने पुढील कार्यवाही केली. सीजरने कॅलिफोर्नियातील शेन्ले उद्योगाच्या द्राक्ष उत्पादनावर बहिष्कार टाकला.

INDUSTRIES

शेन्लेंवर बहिष्कार!

काय चाललंय हे?

शेन्लेंची उत्पादने घेऊ नका. ते त्यांच्या मजुरांचं शोषण करतात.

मार्चपर्यंत, द्राक्ष उत्पादकांविरुद्ध चाललेल्या या संपाला सहा महिने झाले. सीजर जाणत होता की आपल्या संपाला आणखी पाठिंबा मिळाला पाहिजे. 17 मार्च 1963 रोजी, त्याने शेकडो शेतकऱ्यांसह डेलानो ते कॅलिफोर्नियाची राजधानी सॅक्रामेन्टो अशी पदयात्रा सुरू केली.

STRIKE

आम्हाला गव्हर्नरला भेटायचंय. त्यांना आमच्या मागण्यांबद्दल ऐकून घ्यावंच लागेल.

आमच्यावरचे अन्याय सर्वांना कळतायत. आम्ही साऱ्या शेतमजुरांना न्याय मिळवून देऊ.

STRIK

पदयात्रेच्या अखेरीस, सीजरला एक खबर मिळाली.

सीजर, शेन्लेंकडून संदेश आलाय. ते करार करायला तयार आहेत.



बहिष्कार आणि प्रचारामुळे शेन्ले उद्योगाची प्रतिमा डागाळली. सीजरने कंपनीच्या वकिलांशी चर्चा केली.

मजुरांनी शेतावर परत यावं, असं कंपनी म्हणतेय.

त्यासाठी मजुरांना पुरेसं वेतन द्या.

25 दिवसांनी, संपकरी राजधानीत पोहोचले. त्यांना सीजरकडून आनंदाची बातमी कळली.

आपण शेन्लेंशी करार केलाय. त्यांनी NFWA ला मजुरांचे प्रतिनिधित्व करायला मान्यता दिलीय.

आणि त्यांनी वेतनात 35 टक्के वाढ केलीय.

प्रकरण 4

# अखेरपर्यंत संघर्ष

शेन्लेंसोबत करार हा NFWA साठी मोठा विजय होता. पण सीजर आणि डोलोरेस हर्टा इतर संघर्षांबद्दल विचार करत होते.

आपण इतर उत्पादकांसोबतही करार केले पाहिजेत.

आपण संप सुरू ठेवूया. तो दीर्घकाळ चालू नये, एवढीच आशा करू.

जुलै 1967 मध्ये, NFWA आणि AWOC अधिकतपणे एकत्र आले. त्यांनी एक नवीन संघटना बनवली- *यूनायटेड फार्म वर्कर्स ऑर्गनायझिंग कमिटी* (UFWOC). सीजर त्याचे संचालक बनले. UFWOC नंतर *यूनायटेड फार्म वर्कर्स* (UFW) बनली.

पुढल्या काही वर्षांत, UFW ने इतर उत्पादकांसोबतही करार केले. UFW सोबत करार न करणाऱ्या उत्पादकांच्या उत्पादनांवर सीजरने बहिष्कार टाकला. इतर संघटनांच्या मजुरांनी त्याला नेहमीच पाठिंबा दिला.

ही द्राक्षं उचलून ठेवा.

अजिबात नाही. ती डीजॉर्जिआ कंपनीची आहेत.

आमचा UFW ला पाठिंबा आहे. त्यांनी डीजॉर्जिआवर बहिष्कार टाकलाय.

लवकरच, UFW ने लोकांना कॅलिफोर्नियाच्या द्राक्षांवर बहिष्कार टाकण्याचे आवाहन केले.

माफ करा, कृपया तुम्ही ही द्राक्षं विकत घेऊ नका आणि शेतमजुरांना मदत करा.

देशभरात लोकांनी द्राक्ष विकत घेणे बंद केले. यानिमित्ताने प्रथमच लोकांना शेतमजुर आणि त्यांच्या हलाखीच्या परिस्थितीविषयी जाणीव झाली.

यादरम्यान, उत्पादक आणि मालक हिंसक होऊ लागले. मजुरांवरचा तणाव वाढला. त्यांचा संयम सुटत चालला.

त्यांनी याच्यावर गाडी घातली.

मारा त्याला!

आपण शांत राहायला हवं.

चावेझ भ्याड आहे!

काही मजूरांनी हिंसेचे उत्तर हिंसेने दिले. शेवटी, संघटनेच्या सभेत, सीजरने हिंसा बंद होत नाही तोवर आपण उपोषण करणार, असे जाहीर केले. सीजरचे आदर्श गांधी यांनीही विरोध व्यक्त करण्यासाठी अनेकदा उपोषण केले होते.

तुम्ही काही खाणार नाही?

अशाने मराल तुम्ही. काय फायदा?

माझ्या बलिदानामुळे, हा संघर्ष आपला सन्मान आणि मूल्यं याबद्दल आहे, याचे लोकांना स्मरण होईल. हिंसेने उत्तर मिळत नाही.



सीजर संघटनेच्या मुख्यालयात एका खोलीत जाऊन बसला. 25 दिवस तो काहीही न खाता फक्त पाणीच प्याला.

हजारो शेतमजूर सीजरला पाठिंबा दर्शवण्यासाठी तिथे आले. प्रसारमाध्यमांनी या गोष्टीस प्रसिद्धी दिली. सीजरचे समर्थन करणारे पाद्रीसुद्धा तिथे आले.

मजुरांनी अहिंसेची शपथ घेतलीय. सीजरने उपोषण सोडले एकदाचे.

लोक सीजरचे ऐकतात कारण तो फक्त संघटनेचीच नाही तर इतरांचीही काळजी घेतो. तो योग्य तेच करु पाहातो..

शेवटी, जुलै 1970 मध्ये, द्राक्ष उत्पादकांचे एवढे नुकसान झाले की त्यांनी सीजरशी करारावर सही करायचे मान्य केले.

कामाचे स्वरूप, पर्यावरण ठरवण्यात मजुरांना समान हक्क असावा.

UFW सगळ्या शेतमजुरांचे प्रतिनिधित्व करेल.

संपकरी मजूर आणि संपात सहभागी लोकांनी बरंच काही गमावून मोठा त्यागच केलाय.

सीजरने आयुष्यात इतरही अनेक संघर्ष केले. लेट्यूस आणि इतर पिकांचे उत्पादक मजुरांना योग्य वेतन देत नसत. त्यांनी UFW ला मजुरांचे प्रतिनिधित्व करायलाही नकार दिला. याविरुद्ध 1970 च्या दशकात संप आणि बहिष्कार ही हत्यारे वापरण्यात आली.

अश्रूधूर!

चालते व्हा इथून!

1970 च्या अखेरीस, सीजरच्या कामाचे परिणाम दिसू लागले. UFW चे 1,00,000 पेक्षा जास्त सदस्य बनले. या मजुरांना चांगले वेतन, नियमित विश्रांती, सुट्ट्या आणि आरोग्यसुविधा मिळू लागल्या.



आयुष्यभर सीजर मजुरांच्या हक्कांसाठी संघर्ष करत राहिला.

La Desgracia de Los Pesticidas

किटकनाशक बंद करा!

urge of Pesticides

आपण शेतमजुरांसाठी लढत राहू. त्यांना अपायकारक किटकनाशक आणि रसायनांसोबत शेतात काम करावं लागतं.

एप्रिल 1993 मध्ये, सीजरचा मृत्यू झाला. शेतमजुरांच्या कल्याणासाठी त्याने केलेला त्याग आणि बलिदानाचे आजही स्मरण केले जाते.

सीजर चावेझ चा जन्म 31 मार्च 1927 रोजी ॲरिझोना प्रांतातील युमा शहरात झाला. त्याचे आजी-आजोबा मेक्सिकन स्थलांतरित होते.

23 एप्रिल 1993 रोजी, सीजरचा झोपेत मृत्यू झाला. त्या दिवशी लेट्यूस मालकांविरुद्ध एका खटल्यात त्याने साक्ष दिली होती.

1944 ते 1946 या काळात सीजर नौदलात कार्यरत होता.

सीजरने आठवीनंतर शाळा सोडली. पण त्याने शिकणे बंद केले नाही. त्याचे UFW चे मुख्यालय नेहमी अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान, संघटना आणि गांधी व इतर जागतिक नेत्यांची चरित्रे या विषयांवरील पुस्तकांनी भरलेले असे. सीजरच्या मते, लोकांनी आपल्या शिक्षणाचा उपयोग दुसऱ्यांची सेवा करण्यासाठी केला पाहिजे.

1975 साली, सीजरने कॅलिफोर्नियात शेतमजुरांसंबंधी एक बिल संमत होण्यात मदत केली. शेतकऱ्यांना हक्क मिळवून देणारे ते पहिलेच बिल होते. यामुळे शेतकऱ्यांना संघटना बनवण्याचा आणि मालकाशी करार करण्यासाठी स्वत:चा प्रतिनिधी निवडण्याचा हक्क मिळाला.

1980 साली सीजरने किटकनाशकांना विरोध करण्यासाठी 36 दिवस उपोषण केले. पण त्याचे सुपरिणाम पाहाण्यासाठी तो जिवंत राहिला नव्हता.

सीजर चावेझ केवळ शेतमजुरांचा नेता होता असे नव्हते. बहुतांशी लोक चावेझला इतिहासातील महत्त्वाचा मेक्सिकी मानतात.

1994 साली, राष्ट्राध्यक्ष बिल क्लिंटन, यांनी सीजरला सर्वोच्च *प्रेसिडेन्शियल मेडल ऑफ फ्रिडम* प्रदान केले. सीजरची पत्नी हेलन आणि त्यांची सहा मुले, यांनी हा सन्मान स्वीकारला.

